**डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला**
**या विद्यापीठाच्या विविध संशोधन क्षेत्रावर संरक्षण**
**भिंत बांधण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक -कृषिवि-२००९/प्र.क्र.१०७/भाग-२/८-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,**
**दिनांक : २० जुलै, २०१०.**

**संदर्भः-**डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांचे पत्र क्र.अप्रवि/योजनांतर्गत/१००४/०९,दि.१४/१०/२००९.

**प्रस्तावना :-**

डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांच्या विविध संशोधन प्रक्षेत्रावर संशोधित पिकांच्या जाती व इतर महत्वपुर्ण संशोधन करण्यात येते. सदर विद्यापीठाच्या अंतर्गत कृषि महाविद्यालय, नागपूर यांच्या जमीनी नागपूर शहरात मध्यवर्ती ठिकाणी व अत्यंत महत्वाच्या जागी आहेत. त्यामुळे त्या क्षेत्रावर अतिक्रमणाचा धोका संभवतो. त्याचप्रमाणे भटकणारी जनावरे इ. त्रासामुळे विद्यापीठाव्दारे चालू असलेल्या मौलिक संशोधन कार्यासन बाधा निर्माण होत आहे. संरक्षण भिंत बांधल्यामुळे विद्यापीठाचे संरक्षण वाढेल तसेच नुकसान टळू शकेल.

संशोधीत पीकाच्या जाती व इतर महत्वपूर्ण संशोधन व विद्यापीठाच्या मालमतेच्या संरक्षणासाठी विद्यापीठाने एकूण १० विविध ठिकाणी संरक्षण भिंत बांधण्याचा एकूण रुपये २५०.३२ लाखाचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावापैकी रु.१० लाखाच्या आतील तीन प्रस्तावाना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला या विद्यापीठाच्या विविध संशोधन क्षेत्रावर संरक्षण भिंत बांधण्याच्या रु.१४.३८ लाखाच्या कामांना शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८ विनियम, दिनांक १५/५/२००९ मधील भाग एक उपविभाग-५, अ.क्र.३ व सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तकातील परिशिष्ट क्र.१३४ मधील तरतूदी नुसार प्रशासकीय मान्यता या शासन निर्णयाव्दारे देण्यात येत आहे. सदर मान्यतेचा बाब निहाय तपशिल खाली दिला आहे.

ख

| | |
|---|---|
| **१) कृषि महाविद्यालय, नागपूर येथील दुग्धविकास प्रभागास भिंत बांधणे.** | **रुपये ९.४७ लाख** |
| **२) कृषि महाविद्यालय,नागपूर येथे kh १९ व २० मध्ये TCM बांधकाम .** | **रुपये १.५५ लाख** |
| **३) कृषि महाविद्यालय,नागपूर येथे अमरावति रोड ते फुटाला टँक TCM बांधकाम.** | **रुपये ३.३६ लाख** |
| **एकूण** | **रुपये १४.३८ लाख** |

या प्रकरणी महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम, १९८३ परिनियम,१९९० आणि लेखासंहिता, १९९१ मधील तरतूदीचा तसेच प्रचलित शासन आदेश/कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१००७२०१४२०१८००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवांने ,**

**सही/-**

**( जी. के. राऊत )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**सदस्य सचिव, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,सर्व्हे नं.१३२/ब, भांबुर्डा भोसलेनगर, पुणे ४११००७**
**कुलसचिव, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विदयापीठ, अकोला ( ३ प्रतीं)**

नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विदयापीठ, अकोला ( ५ प्रतीं)
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती )
आयुक्त दुग्धव्यवसाय महाराष्ट्र राज्य, मुंबई
आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य. पूणे.
आयुक्त मत्स्यव्यवसाय महाराष्ट्र राज्य मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर (३ प्रती )
जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला ( ३ प्रती )
उप मुख्य लेखा परीक्षक, ( वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, अमरावती . (३ प्रती )
उप विभागीय कृषि अधिकारी, अकोला. ( ३ प्रती )
जिल्हा लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विदयापीठ, अकोला (३प्रती )
वित्त विभाग (व्यय-१) ( बीयुडी-१२)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
अवर सचिव, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय , मुंबई-३२
कक्ष अधिकारी, कार्यासन ६ अे, ७-अे, कृषि व पदुम विभाग,